राज्यातील दूध दर निश्चित करण्यासाठी
समिती गठीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमएलके- २०२३/प्र.क्र.६३/पदुम-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय - विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक: २७ जून, २०२३

**शासन निर्णय:-**

राज्यातील दूध दर प्रश्नाबाबत दूध उत्पादक, सहकारी व खाजगी दूध संघ, पशुखाद्य उत्पादक कंपन्या व शेतकरी संघटनांच्या प्रतिनिधींसोबत दि.२२.६.२०२३ रोजी मा.मंत्री (पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास) यांचे अध्यक्षतेखाली बैठक आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत दूध उत्पादक संघटनांचे प्रतिनिधी यांनी दूधाच्या दरामध्ये मोठ्या प्रमाणात घसरण झाली असून, दूध उत्पादक शेतकऱ्यांमध्ये त्यामुळे असंतोष निर्माण झाला आहे, असे नमूद केले.

राज्यात दूध संकलन हे प्रामुख्याने खाजगी व सहकारी दूध संघांकडून करण्यात येते. दुधाच्या कृश काळात दूध उत्पादन कमी असल्याने, शेतकऱ्यांच्या दूधाला रास्त भाव मिळतो. तथापि, दुधाच्या पुष्ट काळात दूध उत्पादन वाढल्याने, विविध खाजगी व सहकारी दूध संघाकडून शेतकऱ्यांचे दूध कमी दराने स्विकारले जाते. यामुळे दूध उत्पादक शेतकऱ्यांना तोटा सहन करावा लागतो.

वरील सर्व बाबी लक्षात घेता, खाजगी/ सहकारी दूध संघांचा परिचालन खर्च (Operating Cost) तसेच दूध उत्पादक शेतकऱ्यांचा उत्पादन खर्च विचारात घेऊन, शेतकऱ्यांच्या दूधाला किमान भाव मिळावा यानुषंगाने दूधाचे दर निश्चित करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई | अध्यक्ष |
| २ | चेअरमन, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई (महानंद) | सदस्य |
| ३ | राष्ट्रीय दुग्ध विकास मंडळ (NDDB) यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | **सहकारी दूध संघांचे प्रतिनिधी** | |
| | i ) जळगांव जिल्हा सह. दुध उत्पादक संघ मर्या., जळगांव | सदस्य |
| | ii) श्री.वारणा सह. दूध उत्पादक प्रक्रिया संघ मर्या., वारणानगर, जि. कोल्हापूर | सदस्य |
| | iii) कोल्हापूर जिल्हा सह. दूध उत्पादक संघ मर्या., कोल्हापूर | सदस्य |
| | iv) औरंगाबाद जिल्हा सह. दूध उत्पादक संघ मर्या., औरंगाबाद | सदस्य |
| ५ | **खाजगी दूध संघांचे प्रतिनिधी** | |
| | i) चितळे डेअरी भिलवडी, जि. सांगली | सदस्य |
| | ii) इंदापूर डेअरी ॲन्ड मिल्क प्रॉ. लि., इंदापुर, जि.पुणे | सदस्य |
| | iii) ऊर्जा मिल्क ॲन्ड मिल्क प्रॉ., पुणे. | सदस्य |
| ६. | उप आयुक्त (प्र.व वि.) आयुक्त दुग्धव्यवसाय कार्यालय, मुंबई | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा:-**

१. समितीने दर ३ महिन्यांनी बैठक घेऊन राज्यातील सहकारी व खाजगी दूध संघाकडून दूध उत्पादक शेतकऱ्यांना गायीच्या दूधाला (३.५/८.५) व म्हशीच्या दूधाला (६.०/९.०) दिला जाणारा किमान दूध दर (Minimum Rate Cap) निश्चित करावा.

२. बैठकीत निश्चित होणाऱ्या दूध दरास आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांनी शासनाची मान्यता घ्यावी.

३. सदर किमान दूध दर कोणतीही कपात न करता दूध उत्पादक शेतकऱ्यांना देणे हे राज्यातील सहकारी व खाजगी दूध संस्थांना बंधनकारक राहील.

४. समितीस वरील सदस्यांव्यतिरीक्त एखाद्या विशिष्ट प्रकरणी तज्ञांच्या अभिप्रायाची आवश्यकता असल्यास, समितीस सदर व्यक्तीस/अधिकाऱ्यास निमंत्रित करण्याची मुभा राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६२७१५५११५७२०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Marale Niwrutti Bhaguji

Digitally signed by Marale Niwrutti Bhaguji
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, pseudonym=85DEC352A563C6C48CE612C5F1F3DBE440A34530, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=Marale Niwrutti Bhaguji
Date: 2023.06.27 15:52:15 +05'30'

**( नि. भा. मराळे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.मा.मंत्री ( दुग्धव्यवसाय ) यांचे विशेष कार्य अधिकारी,मंत्रालय, मुंबई.
२. चेअरमन, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ मर्या., मुंबई (महानंद)
३.प्रधान सचिव ( पदु ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५.आयुक्त, अन्न व औषध प्रशासन,महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६.आयुक्त, पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७.प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
८.जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
९.संबंधित सहकारी / खाजगी दूध संघ.
१०.निवडनस्ती.